**मुंबई गोवा राष्ट्रीय महामार्ग क्र.६६(जुना १७) वरील सावित्री नदीवर बिरवाडी ता.महाड गावाजवळ असलेला ब्रिटीशकालीन कमानी पूल दि.२/०८/२०१६ रोजी रात्री सुमारे ११.३० चे दरम्यान महापूरात वाहून गेल्याबाबत न्यायालयीन चौकशीसाठी नियुक्त आयोगास सहाय्य करण्यासाठी सचिव व खाजगी सचिव यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०१६/प्र.क्र.२५८/रा.म.-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ५ जानेवारी, २०१६

**प्रस्तावना:-**

मुंबई-गोवा राष्ट्रीय महामार्ग क्र.६६ (जुना-१७) वर कि.मी.१२९/४०० मध्ये सावित्री नदीवर बिरवाडी ता.महाड गावाजवळ असलेला ब्रिटीशकालीन कमानी पूल दिनांक २ ऑगस्ट, २०१६ रोजी रात्री सुमारे ११.३० चे दरम्यान महापूरात वाहून गेला आहे. त्यामुळे या घटनेची न्यायालयीन चौकशी करण्यात येईल अशा आशयाचे निवेदन मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिनांक ४/८/२०१६ रोजी महाराष्ट्र विधानसभा तसेच विधानपरिषदेत निवेदन केले आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०१६/प्र.क्र.२५८/रा.म.-१, दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ अन्वये THE COMMISSION OF INQUIRY ACT, १९५२ मधील तरतूदीनुसार न्यायालयीन चौकशी करण्यासाठी श्री. एस.के.शाह, सेवानिवृत्त न्यायाधीश, उच्च न्यायालय, मुंबई यांची एक - सदस्यीय समिती नियुक्त केली आहे. सदरील चौकशी समितीच्या कामकाजासाठी समितीचे अध्यक्ष यांचे शिफारशीनुसार अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

दिनांक २/८/२०१६ रोजी महापूरात सावित्री नदीवर बिरवाडी ता.महाड गावाजवळ असलेला ब्रिटीशकालीन कमानी पूल वाहून गेल्याबाबत THE COMMISSION OF INQUIRY ACT, १९५२ मधील तरतूदीनुसार न्यायालयीन चौकशी करण्यासाठी दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये श्री. एस.के.शाह, सेवानिवृत्त न्यायाधीश, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या नियुक्त केलेल्या एक सदस्यीय समितीच्या कामकाजासाठी खालीलप्रमाणे अधिकारी/कर्मचारी यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

१. श्री.संजीव रामचंद्र खानझोडे, सेवानिवृत्त प्रधान जिल्हा न्यायाधीश -सचिव
२. श्री.अरुणकुमार मोहनलाल टेलर, सेवानिवृत्त खाजगी सचिव, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई - खाजगी सचिव

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरउपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०१७०१०५१६०१२६२५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep E Dalvi

Digitally signed by Pradeep E Dalvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=716d09513325160a8ae457d38bdb1108a805f4db1fec141f11bc887b7810d338, cn=Pradeep E Dalvi
Date: 2017.01.05 16:05:49 +05'30'

**(प्रदीप दळवी)**
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित:-

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्रयांचे सचिव
३. मा.मंत्री, (महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. सचिव, रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
७. अपर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०.प्रधान सचिव (विधी व परामर्शी), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११.विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
१२.सचिव (रस्ते), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३.सचिव (बांधकामे), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१४.मुख्य अभियंता (पी-६), रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
१५.मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.), कोकण भवन, नवी मुंबई
१६.जिल्हाधिकारी, रायगड, मु.अलिबाग
१७.पोलीस अधीक्षक, रायगड, मु.अलिबाग
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१९.महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२०.जिल्हा कोषागार अधिकारी, अलिबाग, जि.रायगड
२१.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (अर्थसंकल्प-११/ व्यय-७)
२२.प्रोथोनोटरी आणि सिनियर मास्टर, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
२३.प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
२४. निवडनस्ती.